सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी“कर्तव्य  कालावधी”
म्हणून नियमित करणेबाबत.
डॉ. खेमेंद्र तु. वाघमारे, वैद्यकीय अधिकारी,गट-ब.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संआसे-२०१८/प्र.क्र.१२/सेवा-१

गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत, ८ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१.

**दिनांक:- १६ मार्च, २०२०.**

**वाचा :-**

१) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई पत्र क्र.संआसे/२अ/टे-४/सखो/ डॉ.खेमेंद्र वाघमारे/१७०/२०१७, दि.२०.०१.२०१७.

२) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई पत्र क्र.संआसे/२अ/टे-४/सखो/ डॉ.खेमेंद्र वाघमारे/२६५०/२०१७, दि.१६/१०/२०१७.

३) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर यांचे मूळ अर्ज क्र.९५७/२०१९ मधील दि.०३.१२.२०१९ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषद गडचिरोली यांच्या दि.३१.१२.२००८ रोजीच्या आदेशान्वये डॉ.खेमेंद्र तुळशिराम वाघमारे, तत्कालीन वैद्यकीय अधिकारी, गट-ब प्राथमिक आरोग्य केंद्र गोंडलवाही यांना सेवांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाकरिता आयुर्वेद महाविद्यालय, नागपूर येथे प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रूजू होण्याकरिता दि.३१.१२.२००८ रोजी म.नं. कार्यमुक्त करण्यात आले.

पदव्युत्तर अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर प्राचार्य आयुर्वेदिक महाविद्यालय, नागपूर यांनी दि.०७.०१.२०१३ रोजीच्या आदेशान्वये संचालक, आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई यांचे कार्यालयात रुजू होण्याकरिता डॉ.वाघमारे यांना कार्यमुक्त केले. त्यानुसार डॉ.वाघमारे हे संचालनालय, मुंबई येथे दि.०९.०१.२०१३ रोजी रुजू झाले आहेत.

संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्यांच्या दि.०७.०१.२०१३ रोजीच्या पत्रान्वये डॉ.वाघमारे यांना पदस्थापना देण्याकरिता जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद गडचिरोली यांना कळविले होते. संचालनालय यांच्या दि१६.०८.२०१३ रोजीच्या पत्रान्वये डॉ.वाघमारे यांना पदव्युत्तर अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर त्यांचे मूळ अस्थापनेवर म्हणजेच प्राथमिक आरोग्य केंद्र गोंडलवाही येथे पदस्थापना देण्यात आल्याचे कळविण्यात आले.

तथापि, गडचिरोली येथे पदस्थापना देण्यात आल्याचे संचालक, मुंबई यांचे दि.०७.०१.२०१३ रोजीचे पत्र हे जिल्हा परिषद गडचिरोली व डॉ.वाघमारे यांना मिळाले नाही. गडचिरोली येथे पदस्थापना

मिळाल्याचे दि.१६.०८.२०१३ रोजीचे आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र डॉ.वाघमारे यांना दि.१८.१०.२०१३ रोजी मिळाले. तथापि, त्यापूर्वीच डॉ.वाघमारे यांची अतिदुर्गम भागातील सेवा विचारात घेऊन त्यांना नागपूर जिल्ह्यात वैद्यकीय अधिकारी, गट-ब पदावर पदव्युत्तर पदस्थापना देणेबाबत संचालनालयाने दि.०८.१०.२०१३ रोजीच्या पत्रान्वये उपसंचालक, नागपूर यांना कळविले होते. त्यानंतर उपसंचालक, आरोग्य सेवा नागपूर व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर यांच्या आदेशानुसार डॉ.वाघमारे, आयुर्वेदिक दवाखाना कवडस, प्राथमिक आरोग्य केंद्र अडेगाव, ता.हिंगणा, जि. नागपूर येथे दि.२४/१०/२०१३ रोजी मध्यान्हपूर्वी रुजू झाले आहेत.

ही वस्तुस्थिती विचारात घेता, डॉ.वाघमारे यांना दि.०८.०१.२०१३ ते दि.२३.१०.२०१३ या कालावधीमध्ये पदस्थापनेविना राहावे लागले व याकरिता ते स्वत: जबाबदार नसल्याचे दिसून येते. त्यामुळे डॉ.वाघमारे यांचा दि.०८.०१.२०१३ ते दि.२३.१०.२०१३ पर्यंतचा कालावधी सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास अनुसरुन शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- सेवेनि १००१/१३०/सेवा-४, दि.०२.०६.२००३ च्या जोडपत्रातील परिशिष्ट-एक मधील अ.क्र.१ नुसार महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम क्रमांक ९(१४)(एफ) संदर्भातील प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन डॉ.खेमेंद्र तुळशीराम वाघमारे यांचा दि.०८.०१.२०१३ ते दि.२३.१०.२०१३ पर्यंतचा प्रशासकीय कारणास्तव पदस्थापनेविना रहावे लागण्याचा सक्तीचा प्रतिक्षेचा पूर्ण कालावधी हा “कर्तव्य कालावधी” म्हणून नियमित करण्यात येते आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१३११५७५७३०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sontakke Premanand Dnyaneshwar

Digitally signed by Sontakke Premanand Dnyaneshwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=248f3abd919bce9c4e68555abc7e467b111c53a87e167edcc566a40a12ae53cd, serialNumber=89357e84059779c4ad0939baba47be1d7999cb1d37b914bdf76f412b21aac1af, cn=Sontakke Premanand Dnyaneshwar
Date: 2020.03.16 16:21:17 +05'30'

**(प्रे.ज्ञा.सोनटक्के)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा नागपूर मंडळ, नागपूर
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
९. डॉ. खेमेंद्र तुळशीराम वाघमारे,वैद्यकीय अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे मार्फत)
१०.निवड नस्ती सेवा-१.